**गृह (परिवहन) विभागामध्ये ई-गव्हर्नन्स प्रकल्प राबविण्यासाठी नियुक्त सल्लागारांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमव्हीडी-०६१९/प्र.क्र.१५२/परि-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक : २३ फेब्रुवारी, २०२३

वाचा :-

१. माहिती तंत्रज्ञान संचालनालय, शासन निर्णय क्र.साप्रवि-मातंसं ०८०/४/२०१४/ ०/० DIRECTORATE OF IT- DIT (MH), दि.०९.०५.२०१९.
२. शासन निर्णय समक्रमांक दि.०१.०८.२०१९, दि. २२.०९.२०२०, दि. २०.०१.२०२१ व दि. १७.०२.२०२२
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.०४.०५.२०२० व शासन निर्णय शुद्धीपत्रक क्र. अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, १४.०८.२०२० दि.२२.१२.२०२०.
४. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र. पआका/का.११/ संगणक/ ई-गव्हर्नन्स राबविण्याबाबत/ २०२२/जा.क्र. १३९७४, दि. १६.१२.२०२२.

प्रस्तावना :-

मोटार वाहन विभागातील ई-गव्हर्नन्स प्रकल्प राबविण्यासाठी M/s KPMG यांची दि.०१.०८.२०१९ पासून एक वर्ष कालावधीकरीता सल्लागार म्हणून नियुक्त करण्यास संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. तद्नंतर उक्त प्रकरणी M/s KPMG या प्राधिकृत संस्थेच्या ०२ वरिष्ठ सल्लागार व ०३ कनिष्ठ सल्लागार यांना आवश्यकतेनुसार वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली होती. या विभागाच्या दि. १७.०२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या विषयांकीत मुदतवाढीचा कालावधी दि. ३१.०१.२०२३ रोजी समाप्त झाल्याने विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या ई-गर्व्हनन्स प्रकल्पासाठी M/s KPMG या प्राधिकृत संस्थेच्या पूर्णवेळ ०२ वरिष्ठ सल्लागार व ०३ कनिष्ठ सल्लागार यांच्या सेवेची आवश्यकता असल्याने त्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

उपर्निर्दिष्ट क्र.२ येथील शासन निर्णय दि.०१.०८.२०१९ मध्ये नमूद केलेल्या अटींच्या अधीन राहून मोटार वाहन विभागातील ई-गव्हर्नन्स प्रकल्प राबविण्यासाठी **M/s KPMG या प्राधिकृत संस्थेच्या ०२ वरिष्ठ सल्लागार व ०३ कनिष्ठ सल्लागार यांना दि.०१.०२.२०२३ ते दि.३१.०१.२०२४ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.**

२. M/s KPMG या प्राधिकृत संस्थेच्या सल्लागारांना उक्त कालावधीतील मानधन वित्त विभागाच्या उपर्निर्दिष्ट क्र. ३ येथील शासन निर्णय तसेच शासन शुद्धीपत्रक दि. २२.१२.२०२० नुसार अदा करण्यात यावा.

३. प्रस्तुत बाबींवर होणारा खर्च मागणी क्रमांक बी-४, २०४५ विक्रेय वस्तु व सेवा यांवरील कर व शुल्क (००) (००) (०१) परिवहन आयुक्त यांचे कार्यालय (२०४५ ००१९) (अनिवार्य) २८-व्यावसायिक सेवा" या लेखाशीर्षांतर्गत त्या-त्या आर्थिक वर्षातील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२३१७५२४७३६२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LANGHI
BHARAT R

Digitally signed by LANGHI BHARAT R
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=adedcaf1e22746fc379c4d04972c090c93ed255751866f45a6b130031dd33559,
pseudonym=B2922612E606733B1ABC8BE253ADA57B2D4704C4,
serialNumber=49CE1A18F73B9A209085E92127FE59850F0B387403911C9F82C1EBF9BE2AB089, cn=LANGHI BHARAT R
Date: 2023.02.23 17:56:48 +05'30'

**( भरत. रा. लांघी )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री (परिवहन) यांचे खाजगी सचिव.
४. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, १/२, मुंबई / नागपूर.
५. प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. संचालक, माहिती तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई.
७. परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. परिवहन उप आयुक्त (प्रशासन/संगणक/लेखा), परिवहन आयुक्त कार्यालय, मुंबई.
९. उप सचिव, नियोजन विभाग, मुंबई.
१०. उप सचिव, वित्त विभाग, मुंबई.
११. अवर सचिव-२, माहिती तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४. कक्ष अधिकारी (बीयुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती (परि-४).